**वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत नांदेड जिल्ह्यातील पूर्ण झालेल्या कामांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२०२५/प्र.क्र.५४/योजना-५**
मोती महल, २ रा मजला
चर्चगेट, मुंबई - ४०० ०२०.
दिनांक : २८ मार्च, २०२५.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.तांसुयो-२०२२/प्र.क्र.४०/योजना-१, दि.३१.०३.२०२२.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.तांसुयो-२०२१/प्र.क्र.८९/योजना-१, दि.३१.०३.२०२२.
३) मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल रिट राचिका क्रमांक २३७३/२०२४ मधील दि.०४.०३.२०२४ रोजीचे आदेश.
४) सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड यांचे क्रमांक ९८३, दि.३०.०५.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत नांदेड जिल्ह्यातील होनवडज या ग्रामपंचायतीमधील पूर्ण झालेल्या कामाला निधी उपलब्ध करुन देण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल रिट याचिका क्रमांक २३७३/२०२४ मध्ये मा. न्यायालयाने दि.०४.०३.२०२४ रोजी दिलेल्या आदेशानुसार सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड यांनी संदर्भ क्रमांक ०४ येथील दिनांक ३०.०५.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालानुसार ग्रामपंचायत होनवडज येथील पूर्ण झालेल्या ०३ कामांकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत संदर्भ क्र.०१ व संदर्भ क्र.०२ येथील अनुक्रमे दि.३१.०३.२०२२ व दि.३१.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये नांदेड जिल्ह्यातील प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांपैकी ग्रामपंचायत होनवडज येथील खालील तक्त्यातील नमूद रू.३०.०० लक्ष रक्कमेच्या पूर्ण झालेल्या ०३ कामांना सद्य:स्थितीत रू.१५,००,०००/- (अक्षरी पंधरा लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. उर्वरित निधी योजनेंतर्गत निधीच्या उपलब्धतेनुसार देण्यात येईल.

| शा.नि.दि. व अ.क्र. | तालुका | ग्रामपंचायत | तांडा/वस्तीचे नाव | कामाचे स्वरुप | कामाची किंमत (लक्ष) | वितरीत केलेला निधी (लक्ष) | उर्वरित निधी (लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३१.०३.२०२२ (१) | मुखेड | होनवडज | गडग्याळवाडी | सी.सी.रस्ता | १०.०० | ०० | १०.०० |
| ३१.०३.२०२२ (१) | मुखेड | होनवडज | होनवडज तांडा | सी.सी.रस्ता | १०.०० | ०० | १०.०० |
| ३१.०३.२०२२ (१) | मुखेड | होनवडज | आबादीनगर तांडा | सी.सी.रस्ता व नाली | १०.०० | ०० | १०.०० |
| **एकूण** | | | | | **३०.००** | **००** | **३०.००** |

२. सदर निधी वितरीत करण्यासाठी उपसचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदरहू निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड यांनी याद्वारे वितरीत निधी करण्यात आलेला निधी नमूद सर्व कामांकरीता समप्रमाणात उपलब्ध करुन देण्याची दक्षता घ्यावी.

४. यावरील खर्च "मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)" या लेखाशिर्षांतर्गत २०२४-२५ या वर्षात उपलब्ध आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०३२८१९०८३७१५३४ असा आहे. सदरहू ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.28 19:09:41 +05'30'

**( र. रा. पेटकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
२. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना, नांदेड.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.

४. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
५. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, लातूर.
६. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण,नांदेड.
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, नांदेड.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
९. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (योजना-१)